**सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता निसर्ग पर्यटन (राज्य) योजनेंतर्गत स्व. उत्तमराव पाटील वन उद्यान निर्मिती (२४०६ २२९५) लेखाशीर्षांतर्गत अनुदान वितरण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सावि-२०२०/प्र.क्र.१०/फ-११**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १५.०३.२०२२

**वाचा:-**

१) महसूल व विभाग, शासन निर्णय क्र. अंदाज-२०१५/प्र.क्र.३६/फ-११, दि. १६.०६.२०१५.

२) महसूल व विभाग, शासन निर्णय क्र. सावि-२०१८/प्र.क्र.११३/फ-११, दि. १३.०६.२०१९.

३) महसूल व विभाग, शासन निर्णय क्र. सावि-२०२१/प्र.क्र.४८/फ-११, दि. २४. १२. २०२१.

४) प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ) म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/ प्र.क्र.५९/२१-२२/६०३, दि.२२.०२.२०२२.

५) प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ) म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/चाबाप्र/पु.मा/प्र.क्र.११०/५६३/२०२१-२२,दि.०९.०२.२०२२

६) प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ) म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/ चाबाप्र/ प्र.क्र.५९/२०२१-२२/६२१, दि.२५.०२.२०२२

**प्रस्तावना :-**

स्व. उत्तमराव पाटील वन उद्यानाची निर्मिती (वन व वनेत्तर जमिनीवरील जैवविविधता व निसर्ग संरक्षण योजना) ही योजना संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये अंमलात आलेली आहे. या योजनेंतर्गत राज्यातील प्रत्येक जिल्ह्यात २ ठिकाणी याप्रमाणे एकूण ६८ उद्याने गावे/शहरे या अंतर्गत तसेच त्यांच्यालगत उपलब्ध असलेल्या शासकीय क्षेत्रावर सल्लागार नेमून वन उद्यानांची निर्मिती करणे तसेच त्याचबरोबर सध्या वन विभागांतर्गत अस्तित्वात असलेल्या राष्ट्रीय व इतर उद्याने यांची आवश्यकतेनुसार श्रेणीवाढ करणे असे या योजनेचे स्वरूप आहे. तसेच सदर योजना सन २०२२-२३ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

२. यास्तव, मागणी क्र. सी-०७-२४०६, वनीकरण व वन्यजीवन राज्य योजनांतर्गत योजना (०२)(०६) निसर्ग पर्यटन (राज्य) स्व. उत्तमराव पाटील वन उद्यान निर्मिती (२४०६ २२९५) या उद्दिष्टांतर्गत अद्याप पावेतो ६६ उद्यानाचे उद्दिष्ट पुर्ण झालेले आहे. त्यापैकी २० उद्याने लोकार्पण करण्यात आली असून ४६ उद्यानांची कामे प्रगतीपथावर आहेत. औरंगाबाद विभागातील लातूर विभागास २ उद्याने निर्माण करण्याबाबत उद्दिष्ट देण्यात आले होते. तथापि, सदर विभागात एका ठिकाणी योग्य क्षेत्र प्राप्त न झाल्याने तेथे एक उद्यान होवू शकलेले नाही. संदर्भाधिन क्र. ४ येथील दि. २२.०२.२०२२ रोजीच्या पत्रान्वये, प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर यांनी रत्नागिरी जिल्ह्यातील, चिपळूण तालुक्यातील मौजे टेरव

येथे जैव विविधता उद्यान निर्मितीचे काम हाती घेणे शक्य असल्याचे कळविले आहे. तथापि, स्व. उत्तमराव पाटील वन उद्यान निर्मिती (२४०६ २२९५) या योजनेसाठी रु. ५०.०० लक्ष इतकी तरतूद करण्यात आली असून या विभागाच्या संदर्भाधिन क्र. ३ येथील शासन निर्णयानुसार उक्त निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे. मागणी क्र. सी-०७-२४०६, वनीकरण व वन्यजीवन राज्य योजनांतर्गत योजना (०२)(०६) निसर्ग पर्यटन (राज्य) स्व. उत्तमराव पाटील वन उद्यान निर्मिती (२४०६ २२९५) या योजनेंतर्गत एकूण ४ योजनांकरिता ६८५.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. सदर योजनेंतर्गत **निसर्ग पर्यटन (राज्य) योजनेंतर्गत स्व. उत्तमराव पाटील वन उद्यान निर्मिती** यासाठी संदर्भाधिन क्र. ६ येथील दि. २५.०२.२०२२ अन्वये प्राप्त प्रस्तावानुसार वनेत्तर क्षेत्रातील पाणथळे, सरोवरे इत्यादी ठिकाणच्या जैवविविधतेचे व्यवस्थापन या योजनेतून निधी वळती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात वन विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या निसर्ग पर्यटन (२४०६ २२९५) या लेखाशिर्षांतर्गत खालील ४ योजनांचा समावेश होत असून सन २०२१-२२ करिता त्या योजनांमध्ये असलेला अर्थसंकल्पीत निधी, सादर केलेले प्रस्ताव, आतापर्यंत प्राप्त मंजूरी, इत्यादीबाबतचा तपशील त्यासमोर दर्शविलेला आहे.

| अ. क्र. | योजनेचे नाव | मंजूर/ अर्थसंकल्पीत नियतव्यय | शासनास सादर केलेले प्रस्ताव | शासन मंजूरी | वितरीत निधी | झालेला खर्च |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | निसर्ग पर्यटन स्थळांचा विकास (Eco Tourism) (२४०६ २२९५) | ६०००.०० | ५१०७.०९ | ६३७.१८ | ६३७.१८ | ५७६.७८ |
| २. | वनेतर क्षेत्रातील पाणथळे, सरोवरे इ. ठिकाणच्या जैवविविधतेचे व्यवस्थापन (२४०६ २२९५) | ५०.०० | १५.०२ | १५.०० | १५.०० | १५.०० |
| ३. | स्व. उत्तमराव पाटील वन उद्यानांची निर्मिती (२४०६ २२९५) | ५०.०० | ५४.१८ | १५.०० | १५.०० | १२.२५ |
| ४. | चंद्रपूर जिल्ह्यातील बल्लारपूर मार्गावर बंगलोरच्या धर्तीवर विसापूर येथे बॉटनिकल गार्डन निर्माण करणे (२४०६ २२९५) | ७५०.०० | ४५०.०० | ४५०.०० | ४५०.०० | ४५०.०० |
| | **एकूण** | **६८५०.००** | **५६२६.२९** | **१११७.१८** | **१११७.१८** | **१०५४.०३** |

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी दि. २५.०२.२०२२ रोजीच्या पत्रान्वये उपरोक्त तक्त्यातील अनुक्रमांक २ येथील वनेतर क्षेत्रातील पाणथळे,

सरोवरे इ. ठिकाणच्या जैवविविधतेचे व्यवस्थापन (२४०६ २२९५) या योजनेंतर्गत अद्याप काही मागणी नसल्याने त्यामध्ये शिल्लक राहणाऱ्या अर्थसंकल्पित निधीपैकी २०.०० लक्ष निधी मौजे टेरव, ता. चिपळूण, जिल्हा रत्नागिरी येथील जैवविविधता उद्यान निर्मिती करता वळती करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. सदर निधी मंजूर असलेल्या योजनांवरच खर्च करण्यात यावा. सदर योजनेतंर्गत प्रस्तावित कामांना तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी देण्यात आली असल्याची खात्री करूनच निधी वितरित करण्यात यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), हे वर्ष २०२०-२१ मध्ये सदर योजनेंतर्गत वितरीत केलेल्या निधीबाबत उपयोगिता प्रमाणपत्र ७ दिवसांत शासनास सादर करतील.

५. ज्या प्रकरणी वन परिक्षेत्र अधिकारी/सहायक वनसंरक्षक यांनी त्यांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराबाहेर तांत्रिक/प्रशासकीय मान्यता दिली आहे, अशा प्रकरणी सक्षम अधिकाऱ्यांनी सुधारित तांत्रिक/ प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे, याबाबत खातरजमा करुनच प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर व प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण) , पुणे यांनी सदर निधी वितरीत करावा.

६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर हे तांत्रिक व प्रशासकीय मंजूरीच्या अनुषंगाने झालेल्या अनियमिततेस जबाबदार संबधितांविरुध्द आवश्यक कार्यवाही करुन त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करतील, या अटीच्या अधीन राहून वरील निधी वितरित करण्यात येत आहे.

७. सदर निधी वितरित करण्यापूवी प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर योजनेसाठी सन २०२१-२२ करीता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीव्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळती केला नसल्याची खात्री करावी.

८. सदर निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदी व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

९. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

१०. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र. सी-०७**
**२४०६, वनीकरण व वन्यजीवन, राज्य योजनांतर्गत योजना,**
**८००(०२) (०६) निसर्ग पर्यटन (राज्य)**
**स्व. उत्तमराव पाटील वन उद्यान निर्मिती (२४०६ २२९५)**

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३१५१७३१३००६१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVIKIRAN
SABAJI GOVEKAR

Digitally signed by RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
DN: c=IN, o=Personal,
pseudonym=bb348b74c34d5cdc104457bb077cbbab2753fda9961368879
3f8ffb2d4595af5,
2.5.4.20=d399ba42648ff6007bc88b201ae47aa7d8a80a09e22cffd4c08887e
4e01ce080, postalCode=416519, st=MAHARASHTRA,
serialNumber=b752370b557d0a3e58b4b069230bc54f6a13d04798d2ee7a
3f1c7dcc5655271c, cn=RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
Date: 2022.03.15 17:33:21 +05'30'

**( डॉ. रविकिरण गोवेकर )**
**मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख ),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण , महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. मुख्य वनसंरक्षक/ वनसंरक्षक ( प्रादेशिक ) (११ वृत्त )
५. वनसरंक्षक, सामाजिक वनीकरण ( ६ वृत्त )
६. उप वनसंरक्षक (प्रा) (सर्व)/ विभागीय वन अधिकारी (प्रा)/ उपविभागीय वन अधिकारी (प्रा)
७. विभागीय वन अधिकारी,सामाजिक वनीकरण ( सर्व जिल्हे )
८. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २ , मुंबई व नागपूर,
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१०.वित्त विभाग,व्यय-१०,अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
११.कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२.कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३.उप सचिव/अवर सचिव(सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४.निवडनस्ती फ-११.